ई-साहित्य प्रकाशन

अंक ४७ , दिनांक ९-११-२००९

# या अंकात वाचा..

- भक्तीचे नवे रुप
- भक्तीरसपूर्ण कविता
- नवरसरंग भक्तीरस स्पर्धेचा निकाल



संपादक -

सोनाली घाटपांडे ( पुणे )
भारती सरमळकर ( मुंबई )
स्वप्ना कोल्हे ( नाशिक )
सचिन काकडे ( मुंबई )
अहं ब्रह्मास्मि ( पुणे )

विशेष अतिथी -

सौ. शालिनी पटवर्धन ( उज्जैन )

# ।। संपादकीय ।।

माणसाचा देव व्हावा,फक्त इतुके होऊ दे !!

माणुसधर्म सर्वलोकी,भक्त इतुके होऊ दे !!

मी देव बोलतोय..मी तुझा धर्म..तुझ्यातला..तुला वंदनीय..पूजनीय..
दशदिशेला तू मला शोधतोस.
तुला अजूनी शोधच आहे माझा..शोधतांना तू तुझ्यासाठी तुझ्या रेषेत तुझ्या अक्षरांवर
धर्मा धर्माधर्माने तू वेगळं करत गेलायेस मला..पण माझा आजही तुझ्यावर राग नाही..
ना तुझ्या भक्तीवर,तुझ्या श्रध्देवर माझा आरोप..तू म्हणतोस म्हणून मी आहे..आहेच
पण तू मानलंस तरच मी.. तेव्हाच मला अस्तित्व..

त्याउलट तू निर्विवाद सत्य...

अरे जरी देव मी....तरी माझा देह तू...तुझ्यातुन मला पाहत आलास पण
कधी तुझ्यात पाहिले नाहीस...तुझ्याच आतला आवाज मी आज तुझ्यातुन येतॊय
होय मी देव बोलतोय..

"अरे माणसा माणसा कधी व्हशील माणुस ? "

थॊर कवयित्री बहिणाबाईंच हे सांगणं.......

एक गाणं म्हणून बऱ्याचदा रसिक हॊउन ऐकत असशील...
अंतराच्या लाख तारा छेडल्या असतील, त्यातल्या संगीताने,
पण कधी या सुरांपलीकडे जाउन स्वरांचा अर्थ लावलास कधी?
नसेल कदाचित.माणसाने किती सांगितलं तरी माणूस ऐकेल हे झालं नाही पण जर देव म्हणजेच मी बोललो.तर तू ऐकतोस हे मी कित्येकदा ऐकलंय.
म्हणून आज मीच तुला सांगतोय,

हॊय मी देव बॊलतॊय...खुप भांडलास....लढलायस माझ्यासाठी...

अगदी रक्ताळलेल्या देहाने ज्या त्या ठिकाणी अजुनही माझी काया पावन ठेवत आलायस...पण त्याने तुझ्यातल्या मी अन माझ्यातल्या तू दोघेही कलंकितच ठरत आलॊ...

आता तू मी हॊ, मी तू होतो...आज तुझ्या त्या रक्तासाठी, मी माझ्या भक्तासाठी....तुझ्यासाठी...तुझ्या "माणुसकी" च्या धर्मासाठी तुझ्याकडे एव्हढच फक्त मागतोय. होय मी तुझा देव बोलतोय....

अरे,त्रिभुवनी तु सर्वलोकी मी तुझ्यातच राहतो



तुच हो रे देव माझा, मीच तुजला सांगतो...!!

धर्मातलाही एक धर्म रक्ताशिवायही वाहतो

भक्त हो तू माणसांचा फक्त इतुके मागतो..

**- सचिन काकडे , मुंबई**

विठू नावाची गोळी
गालाले सारली
राग - लोभा अळीमिळी
गोळीने घातली !

कामकाजाची चिपळी
हाताले धरली
दैन्य दुरित सारी
चिपळीने सारली !

भक्ती भावाची  धुंदी
मनाले चढ़ली
दुखणी गा-हाणी सारी
परीनामे सरली !

विठू नामाची महती
काळजाले भिनली
ऊभा विठू ठायी ठायी
ऐसी करणी घडली !

रंग़ी -रंगी पांडुरंगी
प्राणज्योत रंगली
एक आनंद अंतरी
द्वैत भावना संपली !

- स्वाती फडणीस ( मुंबई )



तुला कशी विनवू ?
माझं मीच सोडवायला हवंय
स्वतःला ह्या कर्मपाशांतून

नाही अडकायचंय
ह्या मोहात,ह्या पाशांत
कठीणही नाहीय गं
तुला अनुभवणं
फक्त एक आवाहन
अन स्वर्गा स्वर्गातून
उसळत येतेस

मदत मागतेय
एकच कर
बिढाल न्यायाने
मला उचलून धर
आपल्या मुखांत
अन निघ घेवून गं
आता श्रमलेय मी इथे !

**- प्रभा प्रभुदेसाई ( आसाम )**

## ....पृथ्वी....

मानव राहतो पृथ्वीवर,हात जोडतो आकाशाला

पृथ्वी देते निद्रा,शांती,अर्घ्य मिळते प्रकाशाला

असा कसा माणूस त्याला उपकाराचे भान नाही

जन्म देते पृथ्वी तिच्या उपकाराची जाण नाही

देव राहतो स्वर्गात त्याच्या मूर्तीपुढे टेकतो माथा

पृथ्वी सांभाळते जन्मभर,तिच्या साठी फक्त लाथा ?

अरे माणसा टेकव माथा रोज एकदा पृथ्वीवर

तीच वाहते भार तुझा तीच सांभाळील जन्मभर

आहे त्यावर श्रध्दा नाही अन अज्ञाताची तुला ओढ

ईश्वराची कर पूजा पण पृथ्वी साठीही कर जोड

**- "स्वप्निल" मंगेश बिरारी ( नाशिक )**

## ....आषाढ़ाचा मास....

आषाढ़ाचा मास । दर्शनाची आस ।
होती तुझे भास । पांडूरंग़ा ।।

साठवावे नेत्री । भक्तीचिया ग़ात्री ।
दिवसा नि रात्री । रूप तुझे ।।

खोवलेला शिरी । तुरा हा मंजिरी ।
वसतो पंढ़री । विठू राया ।।

भिवरेच्या तिरी । उभा वीटेवरी ।
कर कटेवरी । ठेवोनिया ।।

काळा नि सावळा । प्रेमाचा पुतळा ।
मनाचा निर्मळा । पांडूरंग ।।

नामयाचा घास । घेऊनिया खास ।
जागवली आस । भक्तीयोगे ।।

घेऊनी वळण । दळतो दळण ।
करितो राखण । जनाईचे ।।

तुकोबाचा भार । घेई शिरावर ।
परि गुन्हेगार । आवलीचा ।।

काय त्या म्हणावं ? देव की मानव ।
कोणाला कळाव ? गारूड ते ।।

श्रध्दा अंधश्रध्दा । फरक तो करा ।
परी कास धरा । प्रयत्नांची ।।

प्रयत्नांच्या अंती । ध्येयाची ती पूर्ती ।
करा श्रम भक्ती । विठू सांगे ।।

जाणा एक सर्व । विश्व हाच देव ।
सांगे ज्ञानदेव । सकलांना ।।

प्राजू म्हणे ऎसे । विश्वाला जपावे ।
प्रयत्न करावे ध्येयासाठी ।।

**- प्राजक्ता पटवर्धन ( अमेरिका )**

# भक्तीरस काव्यस्पर्धा निकाल

**नवरसरंग स्पर्धेमध्ये विजेत्या ठरलेल्या कवितांची काही भक्ती - काव्यसुमने !!!**

## प्रथम क्रमांक

### ....व्याकुळ....

मोहात गुंतले
असे माझे मन
तोडूनी वेसण
धावताहे

जरी तू सावळा
आहेस सुरुप
आणि मी कुरुप
अंर्तबाह्य

तुझ्या दर्शनाने
झालो मी पावन
पेटलेले रान
शांत झाले

भक्तीचा भुकेला
आहे मी उपाशी
घेई चरणाशी
विठ्ठला तू

\- निलेश कुंभार



### ....आर्शिवाद देही....

हा जीव ना जळावा
अमृतास प्याया
हे घोट जीवनाचे
मजला मधुर वहावे

कोणास ना कधीही
फसवून मी हसावे
अन भाट होऊनीही
मी ना कधी झुकावे

उधळीत रंग़ यावे
उधळून तृप्त व्हावे
जिंकून मैफलींना
मागे सुखी उरावे

आयु सरुन जाई
नच मात्र एक लाभे
मज लाभले परि जे
कश्चति न दूर जावे

ना संत मी न थोर
बाहूंत क्षिण जोर
लाटांवरी तरुनी
मी फक्त पार व्हावे

देवा तुझ्या कृपेने
सुखवंत आज आहे
शब्दांस एकदाही
वाया न घालवावे

आशिर्वाद देही
तुज सर्वदा स्मरावे
माणूस तू घडवले
माणूस मी रहावे

\- "रसप" रणजीत पराडकर

## द्वितीय क्रमांक

### ....तुझ्यामुळे....

सृष्टीचे वरदान लाभले तुझ्यामुळे
आनंदाने जीवन फुलले तुझ्यामुळे

रोज नव्याने पहाट येते
संध्या मोहक रंग उधळते
रात्रीने चैतन्य लाभते तुझ्यामुळे

नव संजीवन रवि किरणाने
शीतलता नव चंद्र दर्शने
लपंडाव दिनरात चालतो तुझ्यामुळे

अमृत धारा वर्षा देते
चक्र ऋतूंचे अखंड फिरते
ऊन सावली खेळ रंगला तुझ्यामुळे
इथे मी पणा क्षुद्र जीवांचा
खेळ चालला कळसूत्रीचा
निराकार तू सुत्र हले जे तुझ्यामुळे

**- रमेश गोरे**

### ....मराठी रक्त....

मराठीची करीन | जन्मभर सेवा |
वाटील हा मेवा | सकळांसी ||
मिरवीन जगी | ज्ञानोबांचा दिवा
उधळीन ठेवा |चैतन्याचा ||
आळवीन मुखे | नामाचे अभंग
होईन मी दंग | भीमातीरी ||
वाचीन मी सदा |तुकोबाची गाथा
घेईन मी माथा | दासबोधा ||
शिवबाचे माझ्या | गाईन पवाडे
चारीन मी खडे | शत्रूलाग़ी ||
जागेन मी सदा | संभाजीच्या धर्मा
कोणाही अधर्मा | झुकणे नाही ||
संताजी धनाजी | व्हावे दोन्ही हात
करीन निःपात | दुर्जनांचा ||
वाहत ठेवीन | पानिपताचा घाव
रक्ताचा भाव | करणे नाही ||
नेईन मी पुन्हा |गंगेकाठी अश्व
उजळीन विश्व | मराठीचे ||
माय मराठीस | गाईन आवडी
जेथवर नाडी | वाहे माझी ||

**- हरीश दांगट**

## तृतीय क्रमांक

### ....नमोस्तुते गणपती....

नमोस्तुते श्रीमहनमंगला । शिवसुता वरदा
गणपती गुणनिधी । त्वामहं ऊमापुता वंदे ॥

भक्तांचा आराध्यदेव तू,मूर्ती सद्‌गुणांची
गणपती गुणनिधी । महामती प्रज्ञा विश्वाची
परमेशांच्या नभात तूची अग्रदूत होशी
गणपती गुणनिधी । कोंदणी चमचम लखलखशी ॥

ज्योतींच्या या नेत्री किंवा नेत्रांच्या ज्योती
गणपती गुणनिधी । विलसतसे तुझीच रे कांती
तू सूर्याचे तेज प्राचीचे सौंदर्यही तूची
गणपती गुणनिधी । सर्वथा घडवी ईष्ट तेची ॥

रिध्दी सिध्दी ही तुझीच रुपे तुझ्याच वामांगी
गणपती गुणनिधी । भक्तजन तुम्हा आद्य पूजिती
जे जे उत्तम उदात्त उन्नत महन्मधुर ते ते
गणपती गुणनिधी । सर्व तू निर्मियले होते ॥

ह्या उत्सवी भक्त गर्जती । सुजन पुजिती ।
श्री गणपती । श्री गणपती । श्री गणपती ।
तुज जेथ स्मरण ते पूजन
तुजविण पूजन ते पतन
तुज सकल चराचर शरण चराचर शरण
श्री गणपती । श्री गणपती । श्री गणपती

\- राजेंद्र करंबळेकर

### ....एक अर्घ्य....

एक अर्घ्य

त्या अंतस्थ प्रकाशाला

ज्याने मोहाच्या सर्वात उंच लाटेवर
आरुढ असतांनाही

सोडले नाही विवेकाचे लगाम

एक अर्घ्य

त्या अबोध अव्यक्ताला

ज्याच्या अनाहत चिरंतन ध्वनींनी

नादालून राहिला मनाचा गाभारा

एक अर्घ्य

त्या अद्‌भुत लावण्याला

जे प्रस्फुटित होत राहिल

सृष्टीतील प्रत्येक नवीन जन्माबरोबर

कोवळया सुकुमार पालवी प्रमाणे

अक अर्घ्य

त्या सर्वव्यापी आनंदाला

ज्याने उजळून टाकला प्रत्येक मनाचा
कानाकोपरा

आणि दिले प्रत्येक शुध्द वेदनेला

निर्मितीचे वरदान

**- आसावरी गुपचूप ( पुणे )**

### ....प्रार्थनाघंटा....

पसरला अनंत अंधार

दाखव तुझे अस्तित्व

चैतन्यदायी प्रकाशाने

राख़ माझे सत्व

माझ्या आर्त हाकांचे

उमटू दे पडसाद

आकाशपोटी तुझ्या

विरु दे माझे प्रमाद

उतरुनी क्रूसावरुनी

अंतरात तू शीर

यातनाभरल्या जीवनाचा

उचल तू भार

तुझ्या प्रार्थनाघंटांच्या ध्वनीने

चिरु दे आभाळाचे काळीज

मेघांचे करुनी वस्त्र

राख दुर्बलांची लाज

पुन्हा बुध्द होवूनी तू

वाजव शांतीचे पडघम

शास्त्र हाती धरल्या

ह्रदयात जागव प्रेम

**- विजयकुमार**

## अतिथीची ओळख....

नवरसरंग स्पर्धेच्या भक्तीरसाच्या परिक्षिका सौ . शालिनी पटवर्धन या पुणे विद्यापिठातून प्रथम श्रेणीत एम. ए. झाल्या आहेत. शासकीय कन्या महाविद्यालय, उज्जैन येथे मराठी विभाग प्रमुख म्हणून कार्यरत.स्फुट-लेखन , कविता, व्यक्तीचित्रण यांचे लेखन.

## अतिथीच्या लेखणीतून....

भक्ती प्रधान कवितांच्या स्पर्धेच्या निमित्ताने सौ . शालिनी पटवर्धन यांनी मांडलेले विचार -

**ऑर्कुटतर्फे घेण्यात आलेल्या काव्य स्पर्धेसाठी परिक्षक म्हणून काम पाहिले, या संदर्भात ज्यांची नोंद घ्याविशी वाटली अशा काही गोष्टी :-**

कविता भक्तीरस परिपोश करणाऱ्या असा विषय होता , एकूण ४३ कविता स्पर्धेत समाविष्ट होत्या.

सध्या संगणकाच्या युगात लेखन, विचार, वाचन, अभ्यास या गोष्टींपासून तरूण मंडळी दूर ठेवली जात आहेत. जीवनाच्या सर्वच क्षेत्रात कृत्रिमपणा, यांत्रिकपणा आलेला असल्याने भावनांची, जिवनमुल्यांची कदर करण्याची सवड व गरज कोणालाही वाटेनाशी झालेली आहे. म्हणूनच नवरसाचा परिपोश असलेली, शब्द - अलंकारांचे लेणे ल्यायलेली कविता आता इतिहासजमा झालेली आहे. प्राचीन मराठी कविता प्रामुख्याने श्रृंगार, भक्ती या रसांचा पुरेपूर परिपोश करणारी अशी आहे. संतांचे , पंडीत कविंचे काव्य उच्च स्तरावर रसांचा परिपोश करणारे असे आहे. कालांतराने भक्ती ही भावना फक्त ईश्वरभक्ती पुरतीच मर्यादीत न रहाता राष्ट्रभक्ती, मातृभक्ती , ध्येयभक्ती, अंगीकारलेल्या कार्यावरची अढळ निष्ठा अशा व्यापकतेने व्यक्त होत गेली.

- भक्तीरस : स्थायीभाव , दृढनिष्ठा, श्रध्दा , विश्वास
- दैवताबद्दल आदर , समरसता , एकरूपता
- शब्दातून वाचकांनाही त्या श्रध्देचा समरसतेचा प्रत्यय आणून देणे
- मोजक्या अर्थपूर्ण भावपूर्ण प्रासादिक शब्दात व शैलीत भावना प्रभावी होणे अपेक्षित

व्याकूळ ,आशिर्वाद देही, मराठी रक्त, जयोस्तु गणपती, एक अर्घ्य, प्रार्थना घंटा, चोरट्याची भक्ती या कविता वरील अपेक्षा थोड्याफार पूर्ण करणाऱ्या होत्या तरीही शब्दसौंदर्य भक्तीरसाचा परिपोश यात उण्याच म्हणाव्या लागतील . प्रयत्न स्तुत्य होता. अलिकडे कवितेला अक्षरगणवृत्त , मात्रावृत्त यांचे बंधन नसते ती मुक्तछंदात असली तरीही त्यात

नाद , लय, आशयातील पारदर्शक प्रासादगुण असावा. कविता मोजक्या व अर्थपूर्ण अर्थसूचक शब्दात लिहिली जाणे अपेक्षित आहे. पूर्वसुरीचे प्राचीन काव्य , साहित्य यांचे वाचन करून आपले विचार समृध्द करावेत ,

सतत वाचन , लेखन , मनन यांचा परिपाठ ठेवावा ही गरज आहे.

‘काव्यांजली’ आणि ‘मराठी कविता’ तुमच्यासाठी घेऊन येत आहेत

=======================================

## नवरस काव्यस्पर्धा मालिका

=======================================

यात आहेत साहित्यातील नऊ रस.प्रत्येक स्पर्धा एका रसावरील कवितांची.
नऊ रस नऊ स्पर्धा एक महा मालिकाच म्हणा ना !!!
दर महिन्याला एक रस तब्बल नऊ महिने चालणारे ही धम्माल !!!
काव्यस्पर्धेचा उद्देश ‘चढाओढ’ हा नाही,
कोणी छोटे मोठे, कविता चांगली वाईट सिध्द करण हा ही नाही .
ही स्पर्धा आपल्या प्रतिभेला आव्हान आहे , सृजनशक्तीला आवाहन आहे.
निवड्क  कविता नेटाक्षरीमध्ये प्रसिध्द  होतील. हजारोंपर्यंत जातील. बक्षिसेही असतीलच.
लिहा मंडळी ! बघुया महाराष्ट्राच्या उद्याच्या ‘लेखण्या’ काय आहेत ते.

=======================================

या महिन्याचा ‘रस’विषय ‘बिभत्सरस’ आणि ‘अद्‌भुतरस’

=======================================

तुमच्या १/२ ‘बिभत्सरस’ आणि ‘अद्‌भुतरस’पूर्ण कविता आम्हाला १५ नोव्हेंबर २००९ पर्यंत
marathikavitamarathispardha@gmail.com
वर पाठवा.

*सोबत आपल्या ऑर्कुट प्रोफाईलची व ब्लॉगची लिंक नक्की पाठवा..*
*अधिक माहिती कम्युनिटीवर मिळेल.*

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास ‘नेटाक्षरी’ जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणाऱ्या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय, नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ५०००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणाऱ्यांची संख्या लक्षणीय आहे.

हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लाभावा हीच इच्छा. आपल्यासारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

*हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी..* netaksharee@gmail.com